खारी बृ.ल. पा. तलाव, ता. कन्नड, जि. औरंगाबाद या योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः लपात २१११( प्र क्र २४८/२०११)/लपा-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रूवारी, २०१५

पहावे

१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. ४११३/विपाविम/काता ७ , दि. ०४.०५.२०१२.
२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्ययस-२०१४/प्रक्र१९९/अर्थ-२ दिनांक १ जानेवारी, २०१५.

प्रस्तावना

महामंडळ निर्णय क्र. गोपाविमं/सुप्रमा/तां.३/खारी बृ.ल.पा./लपा-२, दिनांक ०९/०३/२००५ अन्वये रुपये रु. २५३१.३४ लक्ष रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००३-२००४ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

आता या शासन निर्णयान्वये खारी बृ.ल. पा. तलाव, ता. कन्नड, जि. औरंगाबाद या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ३३७६.६५ लक्ष ( रु. तेहत्तीस कोटी, श्याहत्तर लक्ष, पासष्ट हजार फक्त) या किंमतीस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठीची एकूण तरतूद रूपये ३०३७.५८लक्ष (रू. तीस कोटी, सदोतीस लक्ष, अठ्ठावन्न हजार फक्त) व अनुषंगीक खर्चासाठीची एकूण तरतूद रूपये ३३९.०७ लक्ष (रू. तीन कोटी,एकोणचाळीस लक्ष, सातशे फक्त) आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००९-२०१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २१.०८.२०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तात नमुद केल्यानुसार "सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या प्रकल्पासाठी तरतूद उपलब्ध करून दिली जाणार नाही. तत्पूर्वी काम पूर्ण करावे." या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग), (४७०२ ४९९२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २८/का-१४३४, दि. ११.०३.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि. २१ ऑगस्ट, २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (८०/२०१५) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५०७४५७९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.12 15:19:04 +05'30'

(रा. बा. क्षीरसागर)
शासनाचे अवर सचिव

सहपत्र-परिशिष्ट अ

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२.
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
९. अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे प्रकल्प मंडळ, औरंगाबाद.
१०.कार्यकारी अभियंता, औरंगाबाद लपा प्रकल्प विभाग, औरंगाबाद.
११.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.लपा-२, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

## शासन निर्णय क्रमांक : लपात २१११( प्र क्र २४८/२०११)/लपा-२, दि. ०५.०२.२०१५

## खारी बृ.ल. पा. तलाव, ता. कन्नड, जि. औरंगाबाद,

## उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | ए - प्राथमिक | ५.५० |
| २ | बी - भूसंपादन | १६२४.६३ |
| ३ | सी - कामे | ९११.९५ |
| ४ | डी- विमोचक | ८१.०८ |
| ५ | ई - प्रपात | १०.७२ |
| ६ | एफ - आर.एच.डी. | ०.०० |
| ७ | जी - पूल | २०.५३ |
| ८ | एच - एस्केप | ५.७१ |
| ९ | के - इमारती | २.७५ |
| १० | एल - मातीकाम | ५६.२३ |
| ११ | एम - वृक्षरोपण | १.५० |
| १२ | ओ - किरकोळ | ४.१० |
| १३ | पी - देखभाल | ३.३० |
| १४ | आर - दळणवळण | १.०० |
| १५ | तीन - वितरीका | १३६.२६ |
| १६ | किल्ड चॅनेल्स | ५०.०० |
| १७ | ड्रेनेज अरेजमेंट्स | ४.४५ |
| १८ | सिलेक्टीव्ह लाईनींग | १०.०० |
| १९ | मेजरिंग डिव्हाइसेस | ६.०० |
| २१ | कॅच वॉटर ड्रनेस | ०.०० |
| २२ | रॉयल्टी चार्जेस | १०१.८७ |
| | **एकुण** | **३०३७.५८** |
| | **आनुषंगिक खर्च** | **३३९.०७** |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | **३३७६.६५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र १०५० हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ९४४९ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ३५७३५/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.०९ > १.००